**शैक्षणिक वर्ष २०१८-१९ आयटीएम कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, नागपूर या संस्थेतील द्वितीय वर्गातील विद्यार्थ्यांचे अन्य संस्थांमध्ये समावेशन करण्यास शासन मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्र.मान्यता -२०१८/प्र.क्र.११/१८/तांशि-४/शिकाना**

शिबीर कार्यालय, हैद्राबाद हाऊस,

सिव्हील लाईन्स, नागपूर -४४०००१

दिनांक: १० जुलै, २०१८.

वाचा :- **संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. २/एनसीजी/वि.सं.ब./२०१८/८८७, दिनांक ०५.०७.२०१८**

**प्रस्तावना :-**

आयटीएम कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, कामठी (संस्था क्रमांक ४३०१ ) या संस्थेने शैक्षणीक वर्ष २०१८-१९ पासून महाविद्यालय बंद करणेबाबतचा प्रस्ताव अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद व शासनाकडे सादर केलेला आहे. सदरहू प्रस्तावाच्या अनुषंगाने अखिल भारतीय तंत्राशिक्षण परिषद, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज, नागपूर विद्यापीठ यांचेकडून महाविद्यालय बंद करण्यास मंजूरी अद्यापपर्यंत प्रदान करण्यात आलेली नाही.त्यामुळे संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी दिनांक ०५/०७/२०१८ च्या संदर्भाधीन पत्राद्वारे आयटीएम कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, कामठी येथील द्वितीय वर्गाच्या विद्यार्थ्यांना राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ अंतर्गत येणा-या संस्थामध्ये प्रवेश क्षमतेच्या मर्यादेतील रिक्त जागांवर संस्था बदल करण्याची विशेष बाब म्हणुन परवानगी देण्याबाबत शासनास विनंती केलेली आहे. त्यास शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

विद्यार्थ्यांचे शैक्षणीक हित विचारात घेता आयटीएम कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, कामठी या संस्थेतील द्वितीय वर्गातील एकूण २० विद्यार्थ्यांचे समावेशन राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ अंतर्गत येणा-या विनाअनुदानित संस्थामध्ये मान्य प्रवेश क्षमतेच्या मर्यादेतील रिक्त जागांवर गुणवत्ता व विकल्प याच्या आधारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. या समावेशनाच्या कार्यवाहीसाठी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

३. याबाबत संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी पुढील कार्यवाही तात्काळ करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०७१०१२०६१०४९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.07.11 15:43:51 +05'30'

**( संजय औ.धारुरकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, नागपूर
३. कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
४. संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई.
६. निवड नस्ती / तांशि-४